राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत कोरडवाहू क्षेत्र विकास कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीत करण्याबाबत.
केंद्र हिस्सा लेखाशीर्ष (२४०१ एप५३९) आणि राज्य हिस्सा लेखाशीर्ष (२४०१ एप५४८)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१९ / प्र.क्र.७ / कार्यासन. ६
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: २६ फेब्रुवारी, २०२०.

<u>वाचा -</u>

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग अर्थसं-२०१९ /प्र.क्र.४४ / अर्थ-३, दि.०१.०४.२०१९.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग अर्थसं-२०१९ /प्र.क्र.९२ / अर्थ-३, दि.०८.०७.२०१९.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग समक्रमांक दि.०१ फेब्रुवारी,२०२०.
४) केंद्र शासन, कृषि आणि शेतकरी कल्याण मंत्रालयाचे पत्र क्रमांक १-२१/२०१८-आरएफएस-III, दिनांक २०.०१.२०२०.
५) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र. राशेअ -४४१९ / प्र. क्र.९८ / ८अे.

**शासन निर्णय-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम या केंद्र पुरस्कृत योजनेंसाठी सन २०१९-२० या वित्तीय वर्षाकरीता मागणी क्र. टी-५, २४०१, पीक संवर्धन, (७९६) जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१)(१९) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रम (केंपुयो ) ( ६० टक्के केंद्र हिस्सा ) (अनुसूचित जमाती ) (२४०१ एप५३९), (३३ अर्थसहाय्य) करीता रु. १४९.४६ लक्ष तरतूद अर्थसंकल्पित आहे. तर त्यास समवर्ती राज्य हिस्सा म्हणून (०१)(२०) राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान- अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम व हवामान बदल शाश्वत शेती संनियंत्रण, प्रतिमानकरण व संपर्क कार्यक्रम (केंपुयो ) ( ४० टक्के राज्य हिस्सा ) (अनुसूचित जमाती ) (२४०१ एप५४८), (३३ अर्थसहाय्य) करिता रु. ९९.६४ लक्ष तरतूद अर्थसंकल्पित आहे. सदर तरतुदीतून केंद्र व राज्य हिश्श्यापोटी अनुक्रमे रु.८९.०५ लाख व रु. ५८.३७ लाख इतका निधी संदर्भीत वाचा क्र.३ येथे नमूद शासन निर्णयांन्वये कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यात आला आहे.

२. कृषि व पदुम विभागाने वाचा क्र.५ येथील नस्तीवर प्रस्तावित केल्यानुसार उपरोक्त योजनेच्या केंद्र हिश्श्याकरीता लेखाशिर्ष (२४०१ एप५३९), (३३ अर्थसहाय्य) या लेखाशिर्षाखाली रु. ६१.१० लाख ( रुपये एकसष्ठ लाख, दहा हजार फक्त ) व त्यास समरुप राज्य हिश्श्यापोटी लेखाशिर्ष (२४०१ एप५४८), (३३ अर्थसहाय्य) या लेखाशिर्षाखाली रु. ४०.७३ लाख (रुपये चाळीस लाख, त्र्याहत्तर हजार फक्त ) इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर (BEAMS ) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

३. सदर निधी अर्थसंकल्पीय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. विभागप्रमुख / नियंत्रण अधिकारी यांनी खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदर निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्ट्ये इ. माहिती, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; आदिवासी विकास विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

४. नियंत्रक अधिकारी/ विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात व आदिवासी घटक कार्यक्रम क्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजने क्षेत्राबाहेरील योजनांवर होणा-या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

५. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेली तरतूद फक्त आदिवासी लाभार्थ्यांकरिता व आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेर केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासी वैयक्तीक लाभार्थ्यांकरिताच खर्च करण्यात यावी.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ व २ येथे नमूद शासन परिपत्रकान्वये तसेच वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३४/२०२०/व्यय १, दि.७/०२/२०२० अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००२१४१६५८०००७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ravindra Digambarro Aute

Digitally signed by Ravindra Digambarro Aute
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, cn=Ravindra Digambarro Aute
Date: 2020.02.26 11:46:45 +05'30'

रविंद्र दि.औटे
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त (कृषी), महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. २ व ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग